**१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या २४ जलदगती न्यायालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : जगन्या १४१८/प्र.क्र.६४/का.नऊ**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- १५ मार्च, २०२३

**संदर्भ :-**१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.जगन्या-१४१६/प्र.क्र.२०४/का-९, दि.१८.०८.२०१७
२) जिल्हा व सत्र न्यायालय, अमरावती, ठाणे, रत्नागिरी व परभणी यांची विविध दिनांकाची पत्रे
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३

**प्रस्तावना :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत ५ वर्षांच्या कालावधीकरीता एकूण २४ जलदगती न्यायालये स्थापन करण्यात आली असून, या २४ जलदगती न्यायालयासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पदनिर्मिती करण्यात आली आहे. या २४ जलदगती न्यायालयांसाठीच्या अस्थायी पदांना दि.२८.०२.२०२३ नंतर पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देणे आवश्यक आहे. संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदर २४ जलदगती न्यायालयांच्या अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या २४ जलदगती न्यायालयांसाठीच्या पुढील अस्थायी पदांना **दि.०१.०३.२०२३ ते दि. ३१.०८.२०२३ पर्यंत अथवा सदर न्यायालयांचा ५ वर्षांचा कालावधी पूर्ण होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीकरीता मुदतवाढ** देण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हा न्यायाधीश संवर्ग | | दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) आणि न्यायदंडाधिकारी संवर्ग | |
|---|---|---|---|---|
| | पदनाम | पदसंख्या | पदनाम | पदसंख्या |
| १ | जिल्हा न्यायाधीश | १२ | दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) आणि न्यायदंडाधिकारी | १२ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १२ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १२ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | १२ | वरिष्ठ लिपिक | १२ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | १२ | कनिष्ठ लिपिक | १२ |
| ५ | शिपाई | २४ | शिपाई | २४ |
| | **एकूण** | ७२ | **एकूण** | ७२ |
| **एकूण पदे : १४४** (७२ + ७२) | | | | |

२. याकरिता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०२-उच्च न्यायालये (१३) १४ व्या वित्त आयोगांतर्गत योजना (१३)(०१) जलदगती न्यायालये (अनिवार्य), संकेतांक क्र. (२०१४ ०५९३)", या लेखाशिर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजुर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२३०३१५१२५६३७१६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2023.03.15 13:01:20 +05'30'

**( नितिन वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति :-**

१) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई ,
२) प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई
३) प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, लातूर, रत्नागिरी, बीड, अमरावती, परभणी, पुणे, अहमदनगर, बुलढाणा, ठाणे, नांदेड, रायगड-अलिबाग, सातारा,उस्मानाबाद, वाशिम, भंडारा, यवतमाळ.
४) महालेखापाल-एक/दोन (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
५) महालेखापाल-एक/दोन ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
६) जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर, रत्नागिरी, बीड, अमरावती, परभणी, पुणे, अहमदनगर, बुलढाणा, ठाणे, नांदेड, रायगड-अलिबाग, सातारा,उस्मानाबाद, वाशिम, भंडारा, यवतमाळ
७) वित्त विभाग व्यय-५,
८) विधि व न्याय विभाग कार्यासन-२३, २४ व २५
९) निवड नस्ती- का. ९.